**राष्ट्रीय कृषि विकास योजनेअंतर्गत परंपरागत कृषि विकास योजनेकरिता सन २०२२-२३ मध्ये सर्वसाधारण प्रवर्गासाठी निधी वितरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्सव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : योजना ३३२२/ प्र.क्र.१३९/१-अे**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, विस्तार, मुंबई- ४०००३२
दिनांक : २८ फेब्रुवारी २०२३.

**संदर्भ:** १) केंद्र शासनाच्या पत्र क्र. ९-१५/२०१८-Org.Fmg, दि. ३० मे, २०१८ अन्वये प्राप्त परंपरागत कृषि विकास योजनेच्या सुधारित मार्गदर्शक सूचना.
२) कृषि आयुक्तालयाचे पत्र क्र.कृआ/पीकेव्हीवाय/निमा/सर्वसाधारण/५९१६, दि.१६.०२.२०२३
३) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३, दिनांक ०४.०४.२०२२
४) केंद्र शासनाचे पत्र क्र. ९-३५/२०१५-Org.Fmg, दि. ०६.०२.२०२३
५)कृषि व पदुम विभाग शासन निर्णय क्र. योजना ३३२२/प्र.क्र.१३९/१-अे, दि. १०.११.२०२२

**प्रस्तावना -:**

राज्य शासनाने राष्ट्रीय शाश्वत शेती अभियानांतर्गत परंपरागत कृषि विकास योजना सन २०१५-१६ पासून केंद्र हिस्सा ६० टक्के व राज्य हिस्सा ४० टक्के या प्रमाणात राबविण्यात येत आहे. केंद्र शासनाच्या निर्देशांनुसार सन २०२२ पासून परंपरागत कृषि विकास योजना ही राष्ट्रीय कृषि विकास योजनेअंतर्गत राबविण्यात येत आहे. केंद्र शासनाने दिलेल्या मान्यतेनुसार सन २०२२-२३ ते सन २०२४-२५ या तीन वर्षात परंपरागत कृषि विकास योजनेची अंमलबजावणी तीन वर्षांच्या कृती आराखड्यानुसार करण्यासाठी संदर्भ क्र.०५ वरील दि.१०.११.२०२२ रोजीच्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आलेली आहे. परंपरागत कृषि विकास योजनेसाठी राष्ट्रीय कृषि विकास योजनेअतर्गत केंद्र शासनाकडून संदर्भ क्र.०४ वरील दि.०६.०२.२०२३ रोजीच्या पत्रान्वये सर्वसाधारण प्रवर्गाकरिता रु. ३८७.६१३ निधी प्राप्त झालेला असून त्यास पुरक राज्य हिस्सा खालीलप्रमाणे आहे-

| तपशील | केंद्र हिस्सा ६० टक्के (२४०१ ए०५६) | राज्य हिस्सा४० टक्के (२४०१ ए०६५) | एकूण |
|---|---|---|---|
| ५०० (प्रथम वर्ष) | २१७.६१२ | १४५.०७५ | ३६२.६८७ |
| ३५० गट (तृतीय वर्ष) | १५२.३२८ | १०१.५५२ | २५३.८८ |
| २० गट (प्रथम व द्वितीय व | १७.६७३ | ११.७८२ | २९.४५५ |
| **एकूण** | **३८७.६१३** | **२५८.४०९** | **६४६.०२२** |

केद्र शासनाकडून प्राप्त झालेल्या निधीच्या अनुषंगाने कृषि आयुक्तालयाने संदर्भ क्र. ०२ वरील पत्रान्वये निधी वितरणाबाबतचा प्रस्ताव शासनास सादर केलेला होता. सदर प्रस्तावाच्या अनुषंगाने ही राष्ट्रीय कृषि विकास योजनेअंतर्गत परंपरागत कृषि विकास योजना सन २०२२-२३ मध्ये राबविण्याकरिता केंद्र हिश्श्यासाठी रू. ३८७.६१३ लाख व राज्य हिश्श्यासाठी रू. २५८.४०९ लाख, असा एकूण रू. ६४६.०२२ लाख निधी कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

राष्ट्रीय कृषि विकास योजनेअंतर्गत परंपरागत कृषि विकास योजना सन २०२२-२३ मध्ये राबविण्याकरिता केंद्र हिश्श्यासाठी रू. ३८७.६१३ लाख व राज्य हिश्श्यासाठी रू. २५८.४०९ लाख, असा एकूण रू. ६४६.०२२ लाख निधी कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना वितरीत करण्यात येत आहे.

२. या प्रित्यर्थ होणारा खर्च चालू सन २०२२-२३ या आर्थिक वर्षाकरीता मंजुर केलेल्या अनुदानातून भागविण्यात येऊन पुढील लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

| केंद्र हिस्सा लेखाशिर्ष | राज्य हिस्सा लेखाशिर्ष |
|---|---|
| **मागणी क्रमांक -डी-३**<br>२४०१ पीक संवर्धन,<br>(००)(३५)कृषी उन्नती योजना - परंपरागत कृषि विकास योजना (केंद्र पुरस्कृत योजना),<br>**केंद्र हिस्सा- ६०%,**<br>**२४०१ ए ०५६** कार्यक्रम, ३३ अर्थसहाय्य. | **मागणी क्रमांक -डी-३**<br>२४०१ पीक संवर्धन,<br>(००) (३६) कृषी उन्नती योजना - परंपरागत कृषि विकास योजना (केंद्र पुरस्कृत योजना),<br>**राज्य हिस्सा -४० %,**<br>**२४०१ ए ०६५** कार्यक्रम, ३३ अर्थसहाय्य. |

**३. सदर योजना राबविताना खालील अटी व शर्तीचे पालन करण्यात यावे-**

१. सदर योजना केंद्र शासनाच्या संदर्भाधिन मार्गदर्शक सुचनानुसार व केंद्र शासनाच्या निधी वितरीत करण्याच्या अटी व शर्ती नुसार राबविण्यात यावी.

२. खर्चाचे लेखे सुव्यवस्थित ठेवून सदर खर्चाचे लेखा परिक्षण अहवाल व उपयोगिता प्रमाणपत्रे केंद्र व राज्य शासनाला लवकरात लवकर प्रगती अहवालासह सादर करण्यात यावेत. योजनेच्या वेगवेगळ्या बाबींवरील भौतिक व आर्थिक प्रगती अहवाल केंद्र व राज्य शासनास प्रत्येक महिन्याच्या ५ तारखेपर्यंत सादर करण्यात यावा.

३. योजनेशी संबंधित ताळेबंद व लेखापरिक्षण जमा खर्चाच्या रकमा यांचा अहवाल अंमलबजावणी यंत्रणेने द्यावा. त्यामध्ये वर्षाच्या सुरूवातीला अखर्चीत रकमा व व्याजाद्वारे मिळालेले उत्पन्न

स्पष्टपणे नमूद करण्यात यावे. जेणेकरून पारदर्शी स्वरूपात रकमा विचारात घेता येतील व संदिग्धता राहणार नाही.

४. कोणत्याही परिस्थितीत मंजूर कार्यक्रमापेक्षा जास्तीचा कार्यक्रम राबविला जाणार नाही याची दक्षता घ्यावी.

५. सदर योजनेकरिता प्राप्त झालेला निधी हा सर्वसाधारण संवर्गाच्या लाभार्थ्यांसाठी खर्च करण्यात येईल याची दक्षता घेण्यात यावी. तसेच केंद्र हिश्श्यास अनुसरून समरूप राज्य हिस्सा खर्च होईल याची दक्षता घेण्यात यावी.

६. सदर निधी खर्च करताना विहित कार्यपद्धती अनुसरून सर्व वित्तीय कायदे/टेंडर नियमावली व नियमांचे/प्रक्रियेचे/वित्तीय अधिकारांच्या मर्यादेत /P.W.D/ मॅन्युअलचे अधिन राहून/ C.V.C.तत्वानुसार/CAG च्या निर्देशानुसार/प्रचलित शासन निर्णय/नियम/परिपत्रक/तरतुदी नुसार, बजेट व कोषागार नियमावली नुसार खर्च करण्याची कार्यवाही अमंलबजावणी यंत्रणांनी करावी. कोणत्याही परिस्थितीत कुठलाही शासन नियम/अधिकाराचा भंग होणार नाही, याबाबत दक्षता घेण्याची जबाबदारी संबंधित क्षेत्रिय कार्यालयाची राहील.

७. वेळोवेळी शासन निर्णयान्वये वितरीत केलेला सर्व निधी पीएफएमएस (PFMS) मधील SNA प्रणालीव्दारे वितरीत करण्याची कार्यपध्दती बंधनकारक राहील.

४. सदर योजनेकरिता आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना योजनेचे नियंत्रण अधिकारी म्हणून व सहाय्यक संचालक, लेखा-१ यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

५. प्रस्तुतचे आदेश वित्तीय अधिकार नियम पुस्तिका,१९७७मधील भाग-पहिला, मधील परिच्छेद १४२ व १४४ अन्वये अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांमध्ये काढण्यात येत आहेत. तसेच, वित्त विभागाचे परिपत्रक क्र. अर्थसं -२०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३, दिनांक ०४.०५.२०२२ व वित्त विभागाचे अर्धशासकीय पत्र क्र. अर्थसं -२०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३, दिनांक ०५.०५.२०२२ अन्वये दिलेल्या मंजूरीनुसार विभागाच्या स्तरावर निर्गमित करण्यात येत आहेत.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक २०२३०२२८१२५५१९२७०१ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

UMESH NARAYAN CHANDIWADE

Digitally signed by UMESH NARAYAN CHANDIWADE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT, 2.5.4.20=0a3a08c7339c487fe2836238383bf91bbd037b93b4bdf6c8e95d1969e585fffe, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=CCBE80FCC6B64503B4E8B1269BD88D631F3F3C2BEF6E1CA70CC9A4E30954011F, cn=UMESH NARAYAN CHANDIWADE
Date: 2023.02.28 12:59:17 +05'30'

**( उमेश चांदिवडे )**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

२) आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
३) प्रधान सचिव (कृषि) यांचे स्वीय सहायक, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
४) संचालक (निविष्ठा व गुणनियंत्रण), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
५) सर्व कृषि संचालक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
६) महालेखापाल, महाराष्ट्र १/२ (लेखा परिक्षा/ लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/ नागपूर.
७) सर्व विभागीय कृषि सहसंचालक.
८) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
९) सहाय्यक संचालक, लेखा -१, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१०) कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
११) निवडनस्ती (कार्यासन १-अे), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.